१३ वित्त आयोगाच्या निधीतून पंचायत राज संस्थाचे संगणकीकरण
(e-PRI) प्रकल्प अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय, क्रमांकव्हीपीएम-२०११/प्र. क्र.६/पं.रा-३.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ एप्रिल, २०११

वाचा :- १) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र . संगणक-२०१०/प्र. क्र ४५/सं.क.,दिनांक १६ नोव्हेंबर, २०१०
२) शासन परिपत्रक ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्रमांक तेविआ २०१०/प्र.क्र ७३/वित्त-४/दि. ८ डिसेंबर २०१०
३) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र. तेविआ २०११/ प्र.क्र २९/वित्त ४/दिनांक २५ मार्च, २०११

प्रस्तावना :- भारतीय घटनेतील ७३ व्या घटना दुरुस्तीनंतर भारतीय राज्य घटनेच्या कलम २४३ नुसार पंचायत राज संस्थांना महत्वपूर्ण अधिकार देण्यात आले असून केंद्र व राज्य सरकारच्या बहुतांशी विकास योजना या पंचायत राज संस्थांमार्फत राबविण्यात येतात. पंचायत राज संस्थांचे बळकटीकरण करुन त्यांचे कारभारात सुसुत्रता व पारदर्शकता आणण्याच्या हेतूने केंद्र शासनाच्या पंचायत राज मंत्रालयाने भारत निर्माण कार्यक्रमांतर्गत ई- पीआरआय (e-PRI) हा उद्देश मार्ग प्रकल्प ( Mission Mode Project) सर्व राज्यांमध्ये राबविण्याचा निर्णय घेण्यात आला. यामध्ये शासनाकडून नागरिकांना देण्यात येणा-या सेवा (G2C) व शासनाकडून, शासनाकडे करण्यात येणा-या संदर्भसेवा (G2G) अशा स्वरुपात सेवा दयावयाच्या आहेत. त्यानुसार महाराष्ट्र राज्यात ई- पीआरआय (e-PRI) अंतर्गत राज्यातील सर्व ग्रामपंचायती, पंचायत समिती व जिल्हापरिषदांचे संगणकीकरण करणे अंतर्भूत आहे. केंद्र शासनाच्या या विकास कार्यक्रमाची राज्यस्तरावर अंमलबजावणी करताना सर्व कामांमध्ये सर्व स्तरावर एकवाक्यता, सुसुत्रता व पारदर्शकता यावी यासाठी शासन निर्णय क्र संगणक-२०१०/प्र. क्र ४५/सं.क, दिनांक १६ नोव्हेंबर, २०१० नुसार प्रकल्प अंमलबजावणी समितीची स्थापना करण्यात आली. प्रकल्प अंमलबजावणी समितीने राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्रामार्फत तयार करण्यात आलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालानुसार {(Detail Project Report (DPR)} तसेच केंद्र शासनाने वेळोवेळी दिलेल्या निदेशांची नोंद घेऊन ई- पीआरआय (e-PRI) प्रकल्प अंमलबजावणीसाठी विविध मार्गदर्शनपर सूचना तयार केल्या आहेत. या मार्गदर्शनपर सूचनांनुसार राज्यात ई- पीआरआय (e-PRI) प्रकल्पाची अंमलबजावणी करावयाची असून केंद्र शासनाच्या निदेशानुसार या प्रकल्प अंमलबजावणीचा खर्च हा १३ व्या वित्त आयोगातून संबंधित पंचायत राज संस्थांना उपलब्ध करुन देण्यात येणा-या निधीतून करावयाचा आहे.

या सर्व बाबींवर सांगोपांग विचाराअंती शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

पंचायत राज संस्थाचे कामाचे संगणकीकरण म्हणजेच ई- पीआरआय (e-PRI) प्रकल्प हा केंद्र शासनाच्या भारत निर्माण कार्यक्रमांतर्गतचा विकास प्रकल्प असून त्याची राज्याकडून पंचायत राज स्तरावर अंमलबजावणी अपेक्षित आहे यास्तव मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ च्या कलम १५३ क (पंचायतींना अनुदेश आणि निदेश देण्याचा राज्य शासनाचा अधिकार ) व महाराष्ट्र जिल्हापरिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम २६१ (१) (राष्ट्रीय व राज्य विकास योजनांच्या हिताच्या दृष्टीने निदेश देण्याचे राज्य शासनाचे अधिकार) यानुसार राज्य शासनास मिळालेल्या अधिकारांचा वापर करुन राज्य शासन सर्व जिल्हापरिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायतींना ई-पीआरआय (e-PRI ) अंतर्गत सर्व पंचायत राज संस्थांचे संगणकीकरण व अनुषंगिक बाबी यासाठी प्रकल्प अंमलबजावणी समितीने केलेल्या सूचना व शासनाने मान्य केलेल्या सूचनांनुरुप कार्यवाही करण्याचे निदेश देत आहे. यानुसार अंमलबजावणी करणे सर्व जिल्हापरिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायतींना बंधनकारक आहे.

२. हा प्रकल्प महाऑनलाईन (राज्य शासन व टी.सी.एस. यांची राज्य शासनाच्या अधिपत्याखालील संयुक्त कंपनी ) मार्फत राबविण्यात येईल.

अ) यासाठी संगणक व प्रिंटरचे स्वरुप (कॅान्फ्युगरेशन) खालीलप्रमाणे राहील.

हार्डवेअर

डेकस्टॉप ( **Deskstop) -**

**Core i5 - 650/4GB DDR/500GB/ DVD Writer/Win 7 Professional & 18.5"TFT/Anti Virus Software/Einternet Port/4Xusb'Optical mouse'Key board/ Rescue & recovery software/5 yrs onsite Warranty.**

प्रिंटर - कम - स्कॅनर **{Printer Cum Scanner ( Muiltifunction )}**

**A4, 8 ppm,16 mb,RAM 600x600 dpi,125 sheet Output tray,150 Sheet input tray,USB Interface & driver Software with 5 years onsite Warranty**

या स्वरुपानुसार (कॉन्फ्युगरेशननुसार) केंद्र व राज्य शासनाच्या दरकरारावरील कंपन्यांचा प्रस्ताव व त्यांनी देऊ केलेल्या संलग्न सुविधा, सर्व्हिस सेंटर व दर, देखभाल दुरुस्ती कालावधी यांचा तुलनात्मक अभ्यास केला असता लिनोव्हो कंपनीचे संगणक घेण्याची शिफारस पंचायत राज संस्थांना करण्यात येत आहे. या कंपनीच्या संगणकाचे दर रुपये ३२३५५/- + कर असा आहे. तसेच कॅनन या कंपनीचा मल्टिफंक्शन प्रिंटर घेण्याची शिफारस करण्यात येत आहे त्याचा दर रुपये ८२८०/- + कर इतका आहे.

ब) सॉफ्टवेअर -

ई- पीआरआय (e-PRI) प्रकल्पांतर्गत एकूण बारा प्रकाराचे सॉफ्टवेअर केंद्रशासनाकडून एन.आय.सी. मार्फत देण्यात येणार आहेत. तसेच पंचायत राज संस्थांकडून देण्यात येणा-या सर्व दाखल्यांचे/ प्रपत्रांचे शासनास्तरावरुन सुसूत्रीकरण करण्यात येत असून याबाबतचे सॉफ्टवेअर महाऑनलाईन सर्व पंचायत राज संस्थांना नि:शुल्क उपलब्ध करुन देणार आहे.

क) ॲन्टीव्हायरस

लिनोव्हो कंपनी उपरोल्लिखित संगणक याच किंमतीत ३ वर्षासाठी अत्याधुनिक ॲन्टीव्हायरस पुरविल त्यानंतर पुढील दोन वर्षासाठी लिनोव्हो कंपनीकडून अत्याधुनिक ॲन्टीव्हायरस पुरविण्यात येणा-या प्रयोजनासाठी प्रतिवर्षी रुपये ६९७/- इतकी रक्कम संबंधित ग्रामपंचायतींनी अदा करावयाची आहे.

ड) <u>इंटरनेट जोडणी</u>

या संगणकाच्या इन्टरनेट जोडणी व दरमहा अदायगी पोटी जो खर्च लागेल (साधारणतः रुपये २००/- दरमहाच्या आत) तो खर्च संबंधित ग्रामपंचायती, पंचायत समिती व जिल्हा परिषदांनी करावयाचा आहे.

इ) <u>संगणक संख्या -</u>

प्रत्येक ग्रामपंचायतीला एक याप्रमाणे तर पंचायत समितीला प्रत्येकी एक व जिल्हा परिषदेला प्रत्येकी चार याप्रमाणे संगणक खरेदी करावीत.

फ) <u>मनुष्यबळ -</u>

महाऑनलाईन प्रत्येक ग्रामपंचायतीसाठी एक संगणक चालक (ऑपरेटर) पुरवेल व ग्रामपंचायत स्तरावर लागणारा स्टेशनरी, टोनर, इत्यादी कंझ्युमेबल बाबीवरील खर्च करेल यासाठी (ऑपरेटर वेतन व कंझ्युमेबल ) महाऑनलाईनला रुपये ८०००/- + कर प्रति मनुष्य अदा करण्यात यावेत. पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावर स्टेशनरी व कंझ्युमेबल इत्यादीचा खर्च संबंधित पंचायत समिती व जिल्हा परिषदा करतील. याकरीता पंचायत राज संस्थांना (जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्राम पंचायत यांना ) जे मनुष्यबळ लागणार आहे ते महाऑनलाईन तर्फे उपलब्ध करुन देण्यात येईल.

<u>जिल्हा परिषद -</u> प्रत्येक जिल्हयास १ प्रोग्रॅमर व ५ डेटा ऑपरेटर

<u>पंचायत समिती</u> - प्रत्येक पंचायत समितीस दोन डेटा ऑपरेटर, एक संगणक तज्ज्ञ व २५ ग्रामपंचायती मिळून एक हार्डवेअर इंजिनियर पंचायत समितीस्तरावर उपलब्ध राहिल.

<u>ग्रामपंचायत -</u> प्रत्येक ग्रामपंचायतीस १ डेटा ऑपरेटर (१००० लोकसंख्येवरील ग्रामपंचायतीसाठी प्रत्येकी एक ऑपरेटर व १००० पेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या ग्राम पंचायतीसाठी ३ ग्रामपंचायती मिळून एक ऑपरेटर याप्रमाणे.)

ग) <u>डिजीटल सही</u>

डिजीटल सही साठी प्रती सहीचा येणारा खर्च (केंद्रशासनाकडून मोफत डिजीटल सही पोटी मिळणारा खर्च वजा जाता ) संबंधित संस्थेस जिल्हा परिषदेने, पंचायत समितीने व ग्राम पंचायतीने अदा करावा.

ह) <u>त्रिपक्षीय करारनामा -</u>

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद महा ऑनलाईन (राज्य शासन उपक्रम ) व प्रत्यक्ष विक्रेते यांच्यामध्ये प्रत्येक खरेदीपात्र वस्तुसाठी (हार्डवेअर कंपोनंट इत्यादींसाठी) त्रिपक्षीय करारनामा करणे आवश्यक राहील. सदर कराराचा नमुना जिल्हा परिषदांना स्वतंत्रपणे पाठविण्यात येत आहे.

<u>यु.पी.एस</u>

तूर्तास यु.पी.एस घेण्यात येऊ नयेत यु.पी.एस खरेदीबाबतच्या सूचना स्वतंत्रपणे देण्यात येतील.

३. केंद्रीय पंचायतराज मंत्रालयाच्या निदेशानुसार e-PRI प्रकल्पांअंतर्गत संगणकीय वस्तू खरेदीसाठी होणारा खर्च व इतर अनुषंगिक खर्च याकरीता आवश्यक असलेला निधी जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायतींनी १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून करावयाचा असून त्यानुसार ग्रामपंचायत/पंचायत समिती

/जिल्हापरिषदासाठी संगणक खरेदी व इतर संलग्न बाबी इत्यादींच्या देयकांची अदायगी संबंधीत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे स्तरावरुन करण्यात येईल असे करताना त्रिपक्षीय करारनाम्यात नमूद केलेल्या अटी व शर्तीनुसार यावरील अदायगी करण्यात यावी. तसेच केंद्रीय दक्षता आयोगाच्या कार्यालयीन ज्ञापन क्रमांक - ०२ -०७-०१-सीटीई-३० दि. ३१ डिसेंबर २००७ नुसार प्रथम कंपनीच्या बँक गॅरंटीची तपासणी मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी करुन नंतर सामुग्री खरेदीचे आदेश द्यावेत. खरेदी प्रक्रिया बाबतच्या सविस्तर सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत.

४. हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov,in या वेबसाइटवर उपलब्ध असून याचा संगणक संकेतांक 20110426162009001 असा आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(सुधीर ठाकरे)
सचिव , महाराष्ट्र शासन

प्रति,

माननीय राज्यपालांचे सचिव
मा. प्रधान सचिव विधानमंडळ सचिवालय
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
शासनाचे मुख्य सचिव
महालेखापाल -१ (लेखा व परिक्षा अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य मुंबई.
महालेखापाल -१ (लेखा व परिक्षा ),महाराष्ट्र नागपूर.
प्रधान सचिव, नियोजन विभाग
प्रधान सचिव, वित्त विभाग
सचिव,माहिती तंत्रज्ञान,मंत्रालय मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
श्री. मोईज हुसेन, राज्य सूचना विज्ञान अधिकारी राष्ट्रीय सूचना केंद्र
तज्ञ सदस्य प्रो.के. पंडया, टाटा इन्स्टीटयूट ऑफ फंडामेंटल रिसर्च (TIFR), मुंबई.
सर्व सहसचिव / उपसचिव (ग्रामविकास विभाग)
मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
अधिदान व लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई / लेखाकोष भवन वांद्रे (पूर्व) मुंबई.
संचालक व तथा मुख्य लेखा परिक्षक, महाराष्ट्र राज्य
जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
मुख्य कार्यचालन अधिकारी, महाऑनलाईन.
निवड नस्ती, पंरा-३ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.